२०११०३१७१७२५५६००१

**पुणे महानगरपालिका**

"अतिरिक्त महानगरपालिका आयुक्त" संवर्गातील एक पद निर्माण करणेबाबत....

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन निर्णय क्र. पीएमसी ३००८/सं.क्र.१६३३/प्र.क्र.४६०/०८/नवि-२२**
**मंत्रालय, मुंबई ४०० ०३२ दिनांक :- ९ जून, २००९**

वाचा :- (१) आयुक्त, पुणे महानगरपालिका यांचे पत्र क्र.मआ/से/४२५, दि.५/८/२००८ व त्यासोबतचा महासभा ठराव क्र.४०७, दि.२१/२/२००७

(२) या विभागाचा शासन निर्णय क्र.संकीर्ण १००५/वर्गीकरण/प्र.क्र.३७९/०५/नवि-२४ दिनांक ४ मे, २००६

**प्रस्तावना :** पुणे महानगरपालिकेच्या आस्थापनेवर अतिरिक्त महानगरपालिका आयुक्त या अभिनामाचे (रु.१२००० ते १६५०० या वेतनश्रेणीत) "एक पद" नव्याने निर्माण करण्यास मान्यता देण्याचा प्रस्ताव महानगरपालिकेच्या ठरावाच्या प्रतीसह, संदर्भाधीन पत्रान्वये आयुक्त, पुणे महानगरपालिका, पुणे यांनी शासनास सादर केलेला आहे. सदर प्रस्तावात अद्याप मान्यता न मिळालेल्या महानगरपालिकेच्या आस्थापनेवरील सध्याचे अखिल भारतीय प्रशासन सेवेतील अतिरिक्त महानगरपालिका आयुक्त (सामान्य) या अभिनामाचे पद निरस्त करुन महानगरपालिका अधिका-यांतून निवड पध्दतीने भरण्यासाठी "अतिरिक्त महानगरपालिका आयुक्त" या अभिनामाचे एक पद निर्माण करण्यास शासनाची मान्यता देण्याची विनंती आयुक्त, पुणे महानगरपालिका, पुणे यांनी केलेली आहे.

आयुक्तांचा प्रस्ताव व पुणे महानगरपालिका क्षेत्रातील वाढती लोकसंख्या, नागरिकरण यामुळे कामाची वाढणारी व्याप्ती आणि प्रस्तावांतील सर्वंकष माहिती विचारात घेवून पुणे महानगरपालिकेच्या आस्थापनेवर "अतिरिक्त महानगरपालिका आयुक्त" या संवर्गातील "एक पद" निर्माण करण्यास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय** :- आयुक्त, पुणे महानगरपालिका, पुणे यांचा प्रस्ताव व त्यातील मुद्दे आणि महानगरपालिका ठराव विचारात घेवून पुणे महानगरपालिकेच्या आस्थापनेवर **"अतिरिक्त महानगरपालिका आयुक्त"** या संवर्गातील (रु.१२००० ते १६५००) **"एक पद"** नव्याने निर्माण करण्यास मुंबई प्रांतिक महानगरपालिका अधिनियम १९४९ चे कलम ५१(४) कलम ४५७ (३) (अ) अन्वये शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

०२. सदर पद भारतीय प्रशासकीय सेवा (भा.प्र.से.) या सेवेतील अधिका-यांतून भरण्यात येईल.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,**

**( सुनील कोठेकर )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

(१) मा.मुख्यमंत्र्यांचे खाजगी सचिव,मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
(२) सचिव, (नवि-२) नगर विकास यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई
(३) आयुक्त, पुणे महानगरपालिका, पुणे,
(४) सह सचिव (सेवा-१०), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
(५) निवडनस्ती, नवि-२२, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई ३२